सन २०१८-१९ या आर्थिक वर्षाकरीता "डॉ.बाबासाहेब आंबेडकर शासकीय रोपवाटींकाचे आधुनिकीकरण व बळकटीकरण" आणि "उच्च तंत्रज्ञानाद्वारे रोपे निर्मितीसाठी जिल्हा व तालुका स्तरावर रोपवाटीका निर्मिती" (२४०६ ८६१३) लेखाशीर्षांतर्गत पुरवणी मागणीद्वारे प्राप्त अनुदान वितरण करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः पुरक -२०१८/प्र.क्र.९७ /फ-११**

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

**दिनांक : १० जानेवारी २०१८.**

**वाचा :-**

१) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक अंदाज-२०१५/प्र.क्र.३६/फ-११, दि.१६.०६.२०१५

२) वित्त विभाग,शासन परिपत्रक क्रमांक- अर्थसं-२०१८/प्र.क.६९/अर्थ-३, दि.०२.०४.२०१८

३) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक साववि-२०१८/प्र.क्र.८७/फ-११, दि. ११.०६.२०१८

४) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक, ( अर्थसंकल्प, नियोजन व विकास ) म.रा. नागपूर, यांचे पत्र क्र. कक्ष-१/पी/यो/चाबाप्र/ प्र.क्र.४८/(SFD) /१६१७/२०१८-१९, दि. १२.१२.२०१८ चे पत्र.

**प्रस्तावना :-**

सामाजिक वनीकरणाचे महत्व लक्षात घेऊन वृक्ष लागवड व संवर्धन करण्याकरीता सामाजिक वनीकरणांतर्गत **"डॉ. बाबासाहेब आंबेडकर शासकीय रोपवाटींकाचे आधुनिकीकरण व बळकटीकरण आणि उच्च तंत्रज्ञानाद्वारे रोपे निर्मितीसाठी जिल्हा व तालुका स्तरावर रोपवाटीका निर्मिती (२४०६८६१३)**" या योजनेंतर्गत सन २०१८-१९ करिता रु.४०००.०० लक्ष इतका निधी अर्थसंकल्पित करण्यात आला आहे. त्यापैकी वित्त विभागाच्या दि. ०२.०४.२०१८ रोजीच्या शासन परिपत्रकानुसार अर्थसंकल्पित निधीच्या ७० % म्हणजे रु.२८००.०० लक्ष निधी संदर्भ क्र. ३ येथील शासन निर्णयान्वये रु.२१९०.०० लक्ष इतका निधी " उच्च तंत्रज्ञानाद्वारे रोपे निर्मितीसाठी जिल्हा व तालुका स्तरावर रोपवाटीका निर्मिती आणि उर्वरित रु. ६१०.०० लक्ष निधी " डॉ. बाबासाहेब आंबेडकर शासकीय रोपवाटींकाचे आधुनिकीकरण व बळकटीकरण " या योजनेसाठी वितरित करण्यात आला आहे.

२. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक ( अर्थसंकल्प,नियोजन व विकास ), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भाधीन पत्रान्वये मूळ अर्थसंकल्पित निधीमधील उर्वरित रु १२००.०० लक्ष व पुरवणी मागणीद्वारे मंजूर रु. ८६००.०० लक्ष असे एकूण रु. ९८००.०० लक्ष मंजूर व अर्थसंकल्पित नियतव्यय उपलब्ध करुन देण्याचा प्रस्ताव शासनास सादर केला आहे. सदर प्रस्तावाच्या अनुषंगाने जुलै २०१८ च्या पावसाळी अधिवेशनात पुरवणी मागणीद्वारे अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या रु.८६००.०० लक्ष निधीपैकी ७० % च्या मर्यादेत रु ६०२०.०० लक्ष वितरित करण्यास नियोजन व वित्त विभागाने मान्यता दिली आहे. सदर निधी वितरणाची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

प्रस्तावेनत नमूद केल्याप्रमाणे सन २०१८-१९ या वित्तीय वर्षात सामाजिक वनीकरण विभागांमार्फत राबविण्यात येणाऱ्या **"डॉ. बाबासाहेब आंबेडकर शासकीय रोपवाटींकाचे आधुनिकीकरण व बळकटीकरण " आणि " उच्च तंत्रज्ञानाद्वारे रोपे निर्मितीसाठी जिल्हा व तालुका स्तरावर रोपवाटीका निर्मिती " ( २४०६८६१३)** या योजनेसाठी पुरवणी मागणीद्वारे अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या रु रु.८६००.०० लक्ष निधीपैकी ७० % च्या मर्यादेत रु ६०२०.०० लक्ष निधी वितरित करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर निधीसाठी नियंत्रक अधिकारी म्हणून प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर हे राहतील. त्यांच्याकडे हा निधी सुपूर्द करण्यात येत आहे. या योजनेंतर्गत घ्यावयाच्या कामाची अंमलबजावणी कृती आराखड्याप्रमाणे, विहित कार्यपध्दतीनुसार आणि ठरविलेल्या मुदतीत करण्याबाबत दक्षता घ्यावी. याबाबत सविस्तर मार्गदर्शक सूचना क्षेत्रीय अधिकाऱ्यांना द्याव्यात आणि अंमलबजावणीबाबत वेळोवेळी आढावा घ्यावा. मंजूर निधीपेक्षा जास्त खर्च होणार नाही याची नियंत्रक अधिकाऱ्यांनी दक्षता घ्यावी.

३. सदर निधी खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्पीय नियम पुस्तिका व वित्तीय अधिकार नियम पुस्तिका यामध्ये उल्लेख केलेल्या तरतुदींनुसार व वेळोवेळी दिलेल्या सूचनांचे पालन करण्यात यावे.

४. सदर निधी अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प,नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भीय पत्र क्रमांक ३ अन्वये उपस्थित केलेल्या त्रुटींची पूर्तता प्रधान मुख्य वनसरंक्षक, सामाजिक वनीकरण , महाराष्ट्र राज्य,पुणे यांचेकडून करण्यात येईल या अटीच्या अधीन वितरित करण्यात येत आहे.

५. जिल्हानिहाय वितरीत तरतुदीची माहिती व राबविण्यात आलेल्या कार्यक्रमाची/झालेल्या खर्चाचा तपशील शासनास दरमहा विहित प्रपत्रात सादर करण्यात यावा. तसेच योजनेचे संनियंत्रण प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर आणि प्रधान मुख्य वनसंरक्षक, सामाजिक वनीकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्यामार्फत व्हावे.

६. सदर योजने अंतर्गत होणारा खर्च खाली नमूद केलेल्या लेखाशीर्षाखाली सन २०१८-१९ च्या मंजूर अर्थसंकल्पीत निधीतून वित्त विभागाच्या संदर्भिय दिनांक ०२.०४.२०१८ रोजीच्या परिपत्रकासोबतच्या परिशिष्टातील अ.क्र.८ मध्ये नमूद केलेल्या अटींच्या पूर्ततेच्या अधिन राहून खर्ची टाकण्यात यावा.

७. **सदर योजने अंतर्गत होणारा खर्च खाली नमूद केलेल्या लेखाशीर्षाखाली सन २०१८-१९च्या मंजूर अर्थसंकल्पीत निधीतून खर्ची टाकण्यात यावा.**

**"मागणी क्र.सी-७,**

**२४०६ वनीकरण व वन्यजीवन, (योजनांतर्गत)**

**(०३) (०४) डॉ.बाबासाहेब आंबेडकर शासकीय रोपवाटीकांचे बळकटीकरण व आधुनिकीकरण-**

**५० इतर खर्च - (२४०६८६१३)**

**उच्च तंत्रज्ञानाद्वारे रोपे निर्मितीसाठी जिल्हा व तालुकास्तरावर रोपवाटीका निर्मिती".**

८. सदर शासन नियोजन विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक १९७/१४७५, दि. ३.०१.२०१९ व वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक ३६७/व्यय १०, दि. ८.०१.२०१९ अन्वये दिलेल्या मंजूरीने निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१९०११०१७५११७७८१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VIRENDRA RAMBAHAL TIWARI

Digitally signed by VIRENDRA RAMBAHAL TIWARI
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=a95e1a9759002ee190cd79464daaba7dc840ec375cd62a646a64986631086810, postalCode=400032, street=R AND F D,4TH FLOOR,MANTRALAYA,MUMBAI, ou=FOREST DEPARTMENT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=VIRENDRA RAMBAHAL TIWARI
Date: 2019.01.10 18:00:55 +05'30'

**(वीरेन्द्र तिवारी)**

**अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (मंत्रालय)**

**प्रत,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक, (वनबल प्रमुख),महाराष्ट्र राज्य,नागपूर.

२. प्रधान मुख्य वनसंरक्षक, सामाजिक वनीकरण , महाराष्ट्र राज्य, पुणे.
३. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
४. मुख्य वनसंरक्षक ( प्रादेशिक ) (११ वृत्त )
५. वनसरंक्षक , सामाजिक वनीकरण ( ६ वृत्त )
६. विभागीय वन अधिकारी, सामाजिक वनीकरण ( सर्व जिल्हे )
७. महालेखापाल, (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १ व २ , मुंबई व नागपूर,
८. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई ४०० ०३२.
१०. निवासी परिक्षा लेखा अधिकारी,मुंबई
११. वित्त विभाग, व्यय-१०, अर्थसंकल्प-०६ मंत्रालय, मुंबई-३२
१२. कार्यासन अधिकारी, फ-२,महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१३. कार्यासन अधिकारी, ब-१,महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१४. उप सचिव/अवर सचिव (सर्व), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१५. निवडनस्ती/फ-११.